**शासकीय आश्रमशाळेसाठी शाळा व्यवस्थापन समितीची पुनर्रचना करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शाआशा-२०१५/प्र.क्र.१८२/का.१३**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २९ जुलै, २०१५

वाचा:-

१) बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिनियम, २००९
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचा शासन निर्णय क्र. पीआरई २०१०/प्र.क्र.२१७/प्राशि-१, दि. १७.०६.२०१०
३) महाराष्ट्र शासन, राजपत्र असाधारण, भाग-४ ब दि. ११.१०.२०११

प्रस्तावना :-

केंद्र शासनाने सहा ते चौदा वयोगटातील सर्व बालकांना मोफत व सक्तीचे शिक्षण देणारा अधिनियम ( Right of Children to Free and Compulsory Education Act) २००९ पारीत करून दि.१.०४.२०१० पासून संपूर्ण भारतात (जम्मू व काश्मीर वगळता) लागू केला आहे.सदर अधिनियमाच्या कलम २१ नुसार प्रत्येक शाळेत एक शाळा व्यवस्थापन समिती गठित करण्याची तरतूद केलेली आहे. सदर अधिनियमास अनुसरून शालेय शिक्षण व क्रीडा विभागाने दि.१७.०६.२०१० रोजी शाळा व्यवस्थापन समिती स्थापन करण्यासंदर्भात शासन निर्णय निर्गमीत केलेला आहे. तसेच महाराष्ट्र शासन राजपत्र, भाग-४ ब दि. ११.१०.२०११ अन्वये अधिसूचना निर्गमित केलेली आहे.

आश्रमशाळा संहितेनुसार सध्या स्थानिक ग्रामपंचायतीच्या सरपंचाच्या अध्यक्षतेखाली आश्रमशाळा समिती स्थापन करणेबाबत तरतुद आहे. त्यानुसार आश्रमशाळा समिती स्थापन करण्यात आल्या आहेत. परंतु त्या कार्यक्षमपणे कार्यरत नाहीत. तसेच सदर समितीची रचना बालकांचा मोफत व सक्तीचे शिक्षण देणारा अधिनियम, २००९ मधील तरतुदीनुसार नाही. आदिवासी विभागातील शासकीय आश्रमशाळांची संथ गतीने होणारी बांधकामे, बांधकामाचा दर्जा तसेच त्याची वेळेत न होणारी दुरूस्ती यामुळे आश्रमशाळांतील मुलांना अनेक समस्यांना तोंड द्यावे लागते. शाळेची किरकोळ दुरुस्तीची कामे अथवा काही समस्या असल्यास त्यासाठी संबंधित शाळेच्या मुख्याध्यापकास वरिष्ठ कार्यालयात पाठपुरावा करावा लागतो. त्यास वेळ लागत असल्याने शाळेची भौतिक परिस्थिती बिघडत जाते. त्यामुळे शाळेच्या शैक्षणिक वातावरणावर परिणाम होऊन शाळेचा शैक्षणिक दर्जाही ढासळतो. त्यामुळे आश्रमशाळेतील शिक्षणाचा व तेथील सुविधांचा दर्जा सुधारण्यासाठी बालकांना मोफत व सक्तीचे शिक्षण

देणारा अधिनियम, २००९ अन्वये शासकीय आश्रमशाळांमध्ये शाळा व्यवस्थापन समितीची पुनर्रचना करणे व शाळा व्यवस्थापन समितीस आर्थिक अधिकार देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

**१.** बालकांना मोफत व सक्तीचे शिक्षण देणारा अधिनियम, २००९ नुसार शालेय शिक्षण व क्रीडा विभागाने त्यांचे दि.१७.०६.२०१० च्या शासन निर्णयान्वये प्रस्तावित व महाराष्ट्र शासन, राजपत्र असाधारण, भाग-४ ब दि. ११.१०.२०११ अन्वये अधिसूचित केल्याप्रमाणे प्रत्येक शासकीय आश्रमशाळेमध्ये खालील प्रमाणे शाळा व्यवस्थापण समिती स्थापन करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**शाळा व्यवस्थापन समितीची रचना**

(१) शाळा व्यवस्थापन समिती किमान १२ ते १६ लोकांची राहील. ( सदस्य सचिव वगळून )

(२) यापैकी किमान ७५ % सदस्य विद्यार्थ्यांचे आईवडील / पालक यापैकी असतील. त्यांची शाळेत होणाऱ्या माता वा पित्यांच्या बैठकीमध्ये निवड केली जाईल किंवा निवडून दिले जाईल.

अ) उपरोक्त ७५ टक्के सदस्यांपैकी तीन चतुर्थांश सदस्य निवासी विद्यार्थ्यांच्या पालकांमधून निवडले जातील.

ब) आणि एक चतुर्थांश सदस्य अनिवासी विद्यार्थ्यांच्या पालकांमधून निवडले जातील.

(३) या समितीमधील एकुण सदस्यांपैकी ५० % सदस्य महिला राहतील.

(४) दोन विद्यार्थी ज्यापैकी किमान एक मुलगी असेल अशांना स्वीकृत सदस्य म्हणुन घेण्यात येईल. स्वीकृत सदस्यांना मतदान करण्याचे अधिकार नसतील. तसेच सदर स्वीकृत सदस्य उपरोक्त एकूण सदस्य संख्येच्या व्यतिरिक्त (additional) असतील.

(५) वरील ७५ % सदस्यांमधून (दोन अ व दोन ब मधील सदस्यांमधून) अध्यक्ष व उपाध्यक्ष यांची निवड करण्यात येईल.

(६) उर्वरित २५ % सदस्यांपैकी एक स्थानिक प्राधिकरणाने निवडून दिलेला प्रतिनिधी, एक शाळेच्या शिक्षकांनी निवडलेले शिक्षक व एक पालक सभेत निवडलेले स्थानिक शिक्षण तज्ज्ञ / बालविकास तज्ज्ञ राहील.

(७) शाळेचे मुख्याध्यापक / प्रभारी मुख्याध्यापक/मुख्याध्यापक नसेल तेथे वरिष्ठतम शिक्षक या समितीचे पदसिध्द सचिव म्हणून काम पाहतील.

## २. शाळा व्यवस्थापन समितीची स्थापना व बैठका

(१) या आदेशापासून तीन महिन्यांच्या आत वरीलप्रमाणे प्रत्येक आश्रमशाळेत शाळा व्यवस्थापन समिती स्थापन करण्याची जबाबदारी संबंधीत शाळांचे मुख्याध्यापक यांची राहील.

(२) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांनी प्रत्येक आश्रमशाळेत शाळानिहाय समित्यांची स्थापना होईल व त्यांचे कामकाज, बैठका नियमितपणे होतात याची खात्री करावी.

(३) सदर शाळा व्यवस्थापन समिती प्रत्येक दोन वर्षांनी पुनर्गठित करण्यात येईल.

(४) शाळा व्यवस्थापन समितीची महिन्यातून किमान एक बैठक होईल. आवश्यकतेप्रमाणे यापेक्षा अधिक बैठका घेण्यास बंधन राहणार नाही.

(५) सदर बैठकीसाठी गणपूर्तीची आवश्यकता राहणार नाही, परंतु जे सदस्य सलग तीन बैठकांस अनुपस्थित असतील त्यांचे सदस्यत्व आपोआप रदद् होईल. त्यांच्याऐवजी नवीन सदस्यांची नेमणूक विहीत पध्दतीने केली जाईल.

(६) बैठकीचे इतिवृत्त स्वतंत्र वहीमध्ये ठेवणेचे बंधनकारक राहील. सदर वहीच्या पृष्ठास अनुक्रंमांक देण्यात आलेले असतील.

(७) शाळा व्यवस्थापन समितीची बैठक आयोजित करण्याची जबाबदारी समितीचे सचिव म्हणून शाळेचे मुख्याध्यापक/ प्रभारी मुख्याध्यापक यांची राहील.

(८)शाळा व्यवस्थापन समितीच्या बैठकीची कार्यवृत्ते, निर्णय यांच्या योग्य प्रकारे नोंदी सचिवांकडून ठेवण्यात येतील व त्या जनतेसाठी उपलब्ध करण्यात येतील.

(९) सदस्य सचिवांनी समितीच्या प्रत्येक बैठकीचे इतिवृत्त प्रकल्प अधिकारी, अपर आयुक्त, आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचेकडे पाठवावे. तसेच सदर इतिवृत्ताची प्रत आदिवासी विकास विभागाच्या वेबसाईटवर अपलोड करावी.

## ३. शाळा व्यवस्थापन समितीची कार्ये

१) बालकांचा हक्क तसेच राज्य शासन, स्थानिक प्राधिकरण, शाळा, माता, पिता आणि पालक यांची कर्तव्ये याविषयी परिसरातील जनतेला सोप्या व कल्पक मार्गाने माहीती देणे.

२) अशैक्षणिक कर्तव्ये शिक्षकांवर लादली जात नाहीत याचे संनियंत्रण करणे

३) शाळेच्या कामकाजाचे संनियंत्रण करणे .

४) शाळेतील विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक प्रगतीचा आढावा घेणे, त्यांच्या अध्ययन सुविधांचे संनियंत्रण करणे व शैक्षणिक गुणवत्ता वाढविण्यासाठी प्रयत्न करणे.
५) शिक्षकांच्या कर्तव्यांचा पाठपुरावा करणे व त्यांच्या समस्यांचे निराकरण करणे.
६) शाळाबाह्य मुलांना शिक्षणाच्या प्रवाहात आणणे.
७) विद्यार्थ्यांच्या गैरहजर राहण्याच्या व गळतीच्या समस्यांवर उपाययोजना करणे
८) विद्यार्थी व पालकांची गा-हाणी ऐकणे .
९) कर्मचा-यांच्या विनाकारण गैरहजर राहण्याच्या समस्यांवर उपाययोजना करणे.
१०) बालकांची १०० टक्के पटनोंदणी व १०० टक्के उपस्थिती यामध्ये सातत्य राहील याची खातरजमा करणे.
११) शाळाबाह्य व अपंग बालकांना शिक्षणाच्या मुख्य प्रवाहात आणणे व शाळेत टिकवून ठेवण्यासाठी प्रयत्न करणे.
१२) आश्रमशाळा, वसतीगृह, कोठीगृह, स्वयंपाकगृह, भोजनकक्ष, सार्वजनिक हॉल, पाणीपुरवठा योजना, जलनि:सारण, विदयुत इत्यादींची किरकोळ दुरुस्ती करणे.
१३) शाळा परिसर सुशोभित करणे व स्वच्छता ठेवणे.

**४. शाळा व्यवस्थापन समितीचे वित्तीय अधिकार**

१) शाळा व्यवस्थापन समितीस रु. १ लाख पर्यंतचा निधी आश्रमशाळा / वसतीगृह, कोठीगृह, स्वयंपाकगृह, भोजनकक्ष, सार्वजनिक हॉल, पाणीपुरवठास योजना, जलनि:सारण, विदयुत याच्या किरकोळ दुरुस्तीसाठी तसेच शाळा परिसर शुशोभित करणे व स्वच्छता ठेवणे यासाठी उपलब्ध करुन देण्यात येईल.

२) सदरचा निधी शाळा व्यवस्थापन समितीचे अध्यक्ष व सचिव यांच्या नावे बँक खात्यात जमा करण्यात येईल. अध्यक्ष व सचिवांच्या एकत्रित सहीने रक्कम बँकेतून काढता येईल.

३) सदर निधीच्या विनियोगाबाबत कागदपत्रे सादर केल्यानंतर प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांचेकडून त्यांची प्रतिपुर्ती करण्यात येईल.

४) वरीलप्रमाणे करावयाच्या कोणत्याही खर्चास प्रथम शाळा व्यवस्थापण समितीची मान्यता घेणे आवश्यक राहील. शाळा व्यवस्थापण समितीच्या मान्यतेशिवाय कोणताही खर्च करता येणार नाही.

५) किरकोळ दुरुस्तीची कामे शाळा व्यवस्थापन समितीने विहीत पद्धतीचा अवलंब करून करावीत.

६) दुरुस्तीच्या कामांचे संनियंत्रण शाळा व्यवस्थापन समितीने वेळोवेळी करुन कामे गुणवत्तापुर्ण होतात किंवा कशी याची खात्री करावी.

७) सदर खर्चाचे लेखे समितीचे सचिव या नात्याने मुख्याध्यापक यांनी ठेवावेत. झालेल्या खर्चाची माहीती प्रत्येक बैठकित समितीसमोर ठेवावी. तसेच खर्चाचे लेखापरिक्षण करुन घ्यावे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२९१७०५१५६३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2015.07.29 17:09:53 +05'30'

**( सु.ना.शिंदे )**

उप सचिव, आदिवासी विकास विभाग

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. मा. मंत्री आदिवासी विकास विभाग यांचे खाजगी सचिव.

३. मा. राज्यमंत्री आदिवासी विकास विभाग यांचे खाजगी सचिव.

४. सचिव ( आदिवासी विकास विभाग ) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

५. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

६. अप्पर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे / नाशिक / अमरावती / नागपूर

७. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिकआदिवासी विकास प्रकल्प.

८. महालेखापाल (लेखा परिक्षा)/ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मंबई.

९. महालेखापाल (लेखा परिक्षा)/ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- २, नागपूर.

१०.सर्व निवासी लेखा परिक्षा अधिकारी.

११.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

१२. सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३. निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.